# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्र. बांधका-०११९/प्र.क्र.<u>४२</u>/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक १५ फेब्रुवारी २०१९.

**<u>विषय</u>** :- पोलीस अधीक्षक, नांदेड यांच्या अधिपत्याखालील पोलीस ठाणे, अर्धापूर, येथील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता प्रकार-२ ची <u>४०</u>, प्रकार-३ ची <u>सहा</u> व प्रकार-४ चे <u>एक</u> असे एकूण <u>४७</u> सेवा निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

**<u>संदर्भ</u>** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) शासन पत्र, गृह विभाग, क्र.बांधका-०११९/प्र.क्र.८/पोल-७, दिनांक २१.०१.२०१९.
4) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-ब/ २८-ब-२/अर्धापूर-पो.स्टे.-निवा.बांध.प्रस्ताव/ ३५८/ २०१८, दिनांक ०७.०२.२०१९.

**ज्ञापन.**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाने पोलीस अधीक्षक, नांदेड यांच्या अधिपत्याखालील पोलीस ठाणे, अर्धापूर, येथील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता प्रकार-२ ची <u>४०</u>, प्रकार-३ ची <u>सहा</u> व प्रकार-४ चे <u>एक</u> असे एकूण <u>४७</u> सेवा निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यासाठी रु.१२,७४,१९,०००/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त खर्चाचे अंदाज हे उपविभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, अर्धापूर, यांनी सन २०१७-१८ च्या राज्य दरसूचीनुसार तयार केले असून ते (१) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड, (२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नांदेड, आणि (३) पोलीस अधीक्षक, नांदेड, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते रु.११,९३,९६,०००/- असे सुधारित केले आहेत आणि त्याप्रमाणे, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस ठाणे, अर्धापूर, येथील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता प्रकार-२ ची <u>४०</u>, प्रकार-३ ची <u>सहा</u> व प्रकार-४ चे <u>एक</u> असे एकूण <u>४७</u> सेवा निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यासाठी एकूण रु.११,९३,९६,०००/- *(रुपये अकरा कोटी, त्र्याण्णव लक्ष, शहाण्णव हजार फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुशास्त्रज्ञाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
३) प्रत्यक्ष काम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४, अनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक बीडीजी-२०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७, अनुसार कार्यवाही करण्यात यावी.
५) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१०, "४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, ००, ८००, इतर खर्च, (००) (००)(०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (कार्यक्रम) (४०७००१५१), ५३-मोठी बांधकामे," याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७८/२०१९/इमा-२, दिनांक १३.०२.२०१९, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९०२१५१७०१२२६६२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL
GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.02.15 17:07:56 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, नांदेड परिक्षेत्र, नांदेड.
३) पोलीस अधीक्षक, नांदेड.

**प्रत-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नांदेड *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारित केलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारित केलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
३) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
४) महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

५) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) निवड फाईल (पोल-७).